राज्य शासनाचे निवृत्तीवेतनधारकास हयातीचा
दाखला सादर करण्यास मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- निवेयो-२०१६/प्र.क्र.६२९/कोषा -प्र-५**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
दिनांक : १८ नोव्हेंबर, २०१६.

**वाचा**:- १) वित्त विभाग शासन निर्णय क्र.निवेयो-०११७/प्र.क्र१२०/कोषा प्र.- ५, दि. १८ऑगस्ट २००८

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ च्या नियम ३३५ व संदर्भांकित शासन निर्णयातील तरतुदीनुसार निवृत्तीवेतनधारकांना, दरवर्षी दिनांक ०१ नोव्हेंबर रोजीचा हयातीचा दाखला, नोव्हेंबर अखेर निवृत्तीवेतन संवितरण अधिकाऱ्यास सादर करावा लागतो. हा हयातीचा दाखला मुख्यत: संबंधित निवृत्तीवेतनधारक ज्या बँकेतून निवृत्तीवेतन घेतात, त्या बँकेमार्फत संबंधित कोषागारास सादर केला जातो.

केंद्र शासनाच्या दिनांक ०८/११/२०१६ चे अधिसूचनेनुसार रु. ५०० व १००० च्या चलनी नोटा रद्द करण्यात आल्या आहेत. त्या नोटा बदलून देणे तसेच बँक खात्यात भरणा करणे यासाठी कालमर्यादा विहित केली आहे. त्यामुळे बँकांवर कामाचा ताण वाढला आहे. याचा विचार करुन केंद्र शासनाने केंद्र शासकीय निवृत्तीवेतनधारकांना हयातीचा दाखला सादर करण्यास दिनांक १५ जानेवारी,२०१७ पर्यंत मुदतवाढ दिली आहे. त्या धर्तीवर राज्य शासकीय निवृत्तीवेतनधारकांनाही हयातीचा दाखला सादर करण्यास मुदतवाढ देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

१. राज्य शासकीय निवृत्तीवेतनधारकांना हयातीचा दाखला सादर करण्यास दिनांक १५ जानेवारी, २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.
२. हे आदेश अनुदान प्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे आणि जिल्हा परिषदांचे निवृत्तीवेतनधारक यांनाही लागू राहतील.
३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१११८१४४३५३१९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Narayan Bhaskar Ringane

Digitally signed by Narayan Bhaskar Ringane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=54324e56f45e28f7831a436ed16f6ba60127e341b1d86d7995abbb40c8e85a9c, cn=Narayan Bhaskar Ringane
Date: 2016.11.18 15:06:13 +05'30'

**(ना.भा.रिंगणे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) राज्यपालांचे सचिव
२) मुख्यमंत्र्यांचे व उपमुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
३) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग

५) प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील कार्यालयप्रमुख
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
७) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
८) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
९) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१०) महालेखापाल (वाणिज्य लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
११) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१२) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
१३) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
१४) *प्रबंधक, मुंबई महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण /नागपूर/औरंगाबाद
१५) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१६) *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवीमुंबई
१९) सहसंचालक, लेखा व कोषागारे पुणे / नाशिक /नागपूर / अमरावती / औरंगाबाद / कोकण भवन, नवी मुंबई
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे
२१) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२२) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०
२३) सर्व कोषागार अधिकारी
२४) सर्व उपकोषागार अधिकारी
२५) वित्त विभागातील सर्व कार्यासने
२६) निवडनस्ती, कोषा-प्रशा-५